**मा. उच्च न्यायालय, मुंबई येथील रिट याचिका क्र. ११५८७/२०१९ जनसेवा शिक्षण संस्था, संचलित जनसेवा हायस्कूल, थेरगाव, जि.कोल्हापूर विरुध्द महाराष्ट्र शासन व इतर यामध्ये मा. न्यायालयाने दि.०७ जुलै, २०२२ रोजी दिलेल्या निर्णयानुसार सदर संस्थेच्या शाळेस अनुदानासाठी पात्र घोषित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : अपाघो-२०२१/प्र.क्र.११५/एसएम-४,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०००३२
दिनांक :- २० जून, २०२४

वाचा:- (१) शासन निर्णय शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक : माशाअ-२००९/(५९९/०९)/ माशि-१, दिनांक २० जुलै, २००९,

(२) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र.माशाअ-२००९/ (५९९/०९)/माशि-१, दिनांक १५ नोव्हेंबर, २०११,

(३) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र.संकीर्ण २०१२/ (१५०/१२)/ माशि-१, दिनांक १६/७/२०१३,

(४) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) यांचे पत्र क्र. अमाशा/मूल्यांकन याचिका/१४-१५/माध्य-ब/३०४/१९५१, दिनांक १६ एप्रिल, २०१५,

(५) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) यांचे पत्र क्र. अमाशा/मूल्यांकन याचिका/१४-१५/माध्य-ब/३०४/२८०८, दिनांक १ जून, २०१५,

(६) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) यांचे पत्र क्र. अमाशा/मूल्यांकन याचिका/१४-१५/माध्य-ब/३०४/२८३०, दिनांक २ जून, २०१५,

(७) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) यांचे पत्र क्र. अमाशा/मूल्यांकन याचिका/१५-१६/माध्य-ब/३०४/३८०७, दिनांक २९ जून, २०१५,

(८) मा. उच्च न्यायालय, मुंबई यांचे आदेश रिट पिटिशन क्र.८४७८/२०१३ व इतर संलग्न याचिका दिनांक १६ जुलै, २०१४ व दिनांक ६ ऑगस्ट, २०१४, रिट पिटिशन क्र.७२०९/२०१४ दि.३० सप्टेंबर, २०१४, Civil Application No.२३६७/२०१४ दिनांक ७ जानेवारी, २०१५ व Civil Application No.१११८/२०१५ दिनांक २३ जून,२०१५

(९) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र. न्यायाप्र-२०१५/(८९/१५)/एसएम-४, दिनांक ०४ ऑगस्ट, २०१५

(१०) मा. उच्च न्यायालय, मुंबई येथील रिट याचिका क्र. ११५८७/२०१९ मधील न्यायनिर्णय दिनांक ०७ जुलै,२०२२

(११) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र. माशाअ-२०२२/प्र.क्र.२७५/एसएम-४, दिनांक ०६ फेब्रुवारी, २०२३

<u>प्रस्तावना</u>:-

राज्याची तत्कालीन आर्थिक परिस्थिती विचारात घेऊन, दि.२४ नोव्हेंबर, २००१ च्या मंत्रिमंडळ बैठकीमध्ये राज्यात नवीन शाळांना परवानगी देतांना "कायम विनाअनुदान" तत्वावर परवानगी देण्याचा निर्णय घेण्यात आला होता. त्यानुसार राज्यामध्ये इंग्रजी माध्यम वगळता प्राथमिक व माध्यमिक शाळांना "कायम विनाअनुदान" तत्वावर परवानगी देण्यात आली आहे. सदर शाळांना अनुदान लागू करण्याची मागणी सर्व संबंधित घटकांकडून वारंवार शासनाकडे करण्यात येत होती. सदर मागणी विचारात घेऊन, कायम विनाअनुदान तत्वावर परवानगी दिलेल्या प्राथमिक व माध्यमिक शाळांच्या (इंग्रजी माध्यमाच्या शाळा वगळून) परवानगी आदेशातील "कायम" हा शब्द वगळण्याची तरतूद संदर्भ क्र. (१) दि. २० जुलै, २००९ च्या शासन निर्णयन्वये करण्यात आली.

२. त्यानुसार सन २०१२-१३ पासून मुल्यांकनाचे विहित निकष पूर्ण करणाऱ्या शाळा अनुदानासाठी पात्र ठरविण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. यासाठी शासनाने संदर्भ क्र. (२) येथील शासन निर्णय, दि. १५ नोव्हेंबर, २०११ व संदर्भ क्र. (३) येथील शासन निर्णय, दि. १३ जुलै, २०१३ अन्वये मुल्यांकनाचे निकष निश्चित करण्यात आले आहेत. सदर निकषानुसार सर्व अटी व शर्तींची पूर्तता करणाऱ्या माध्यमिक शाळा व त्यामध्यील वर्ग /तुकड्या अनुदानासाठी पात्र म्हणून घोषित करण्यात येतात. शाळा, वर्ग/तुकड्या अनुदानासाठी पात्र ठरल्या असल्या तरी त्यांना अनुदानाचा हक्क प्राप्त होत नाही. अनुदानासाठी पात्र ठरलेल्या शाळा, वर्ग /तुकड्या यांना अनुदान देणे हा शासनाचा स्वेच्छाधिकार असून, निधीच्या उपलब्धतेनुसार अनुदान दिले जाते. हे अनुदान भूतलक्षी प्रभावाने लागू केले जात नसून निधी उपलब्ध होई पर्यतची कोणतीही थकबाकी अनुज्ञेय होत नाही.

३. संदर्भ क्र. (१) येथील शासन निर्णय, दिनांक २० जुलै, २००९ अन्वये परवानगी आदेशातील “कायम” शब्द वगळण्यात आलेल्या माध्यमिक शाळांना शासन निर्णय, दिनांक १५ नोव्हेंबर, २०११ नुसार विहित केलेल्या निकषानुसार आरक्षण धोरणाचे पालन न केल्यामुळे शाळांना अनुदानासाठी अपात्र ठरविल्यामुळे संबंधित शिक्षण संस्थानी मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे रिट याचिका क्र. ८४७८/२०१८ व इतर संलग्न याचिका दाखल केली होती. यावर मा. न्यायालयाने दिनांक १६ जुलै, २०१४ रोजी आदेश दिले आहेत. तसेच सदर प्रकरणी मा. उच्च न्यायालयाच्या मुख्य न्यायधिशांच्या खंडपीठाने दि. ०६ ऑगस्ट, २०१४ रोजी आदेश देऊन यापूर्वीचा दि. १६ जुलै, २०१४ च्या आदेशात सुधारणा केली होती. त्यांनतर रिट याचिका क्र.७२०९/२०१४ व इतर संलग्न याचिकांमध्ये मा. उच्च न्यायालयाने दि. ३० सप्टेंबर, २०१४ रोजी आदेश दिले आहेत.

४. मा. उच्च न्यायालयाने दिलेल्या वरील आदेशानुसार कार्यवाही शक्य नसल्याने सदर आदेश सुधारण्यासाठी शासनाने मा. न्यायालयात दिवाणी अर्ज क्र.२३६७/२०१४ दाखल केला होता. तसेच, अशाच प्रकारच्या अन्य याचिका प्रकरणी मा. उच्च न्यायालयात दाखल झालेल्या रिट याचिका क्र.७२०९/२०१४ व इतर संलग्न याचिकांमध्ये मा. उच्च न्यायालयाने दि. ३० सप्टेंबर, २०१३ रोजी दिलेल्या आदेशामध्ये सुधारणा करण्यासाठी शासनाने दिवाणी अर्ज क्र. २३६७/२०१४ दाखल केला होता. त्यामध्ये अनुदानास पात्र ठरविण्यासाठी आरक्षण धोरणाचे पालन करणे आवश्यक असल्याची बाब मा. उच्च न्यायालयाच्या निदर्शनास आणण्यात आली. तरीही, मा. उच्च न्यायालयाने शासनाने

दाखल केलल्या दिवाणी अर्ज क्र. २३६७/२०१४ व क्र. २९२५/२०१४ तसेच रिट याचिका क्र. ९४४१/२०१४ मध्ये दि. ०७ जानेवारी, २०१५ रोजी आदेश दिले आहेत.

५. मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल झालेल्या संदर्भ क्र. (८) येथील याचिकांवर मा. उच्च न्यायालयाने दिलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने संबंधित शिक्षण संस्थांची शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), पुणे यांचे स्तरावर सुनावणी घेण्यात आली होती. सुनावणी अंती शासन निर्णय, दि. १५ नोव्हेंबर, २०११ व दि.१६ जुलै, २०१३ आणि मा. उच्च न्यायालयाचे दि. ०७ जानेवारी, २०१५ चे आदेश विचारात घेऊन संदर्भ क्र. (१०) येथील शासन निर्णय, दि.०४ ऑगस्ट, २०१५ अन्वये कायम विना अनुदानित तत्वावर मान्यता दिलेल्या खाजगी माध्यमिक शाळा व वर्ग/तुकड्यां मुल्यांकनात पात्र घोषित करण्यात आल्या आहेत.

६. संदर्भ क्र. (१०) येथील शासन निर्णय, दि.०४ ऑगस्ट, २०१५ सोबतच्या “प्रपत्र- क” येथील अ.क्र. (६) येथे नमूद “जनसेवा शिक्षण प्रसारक थेरगांव सैदापूर संचालित जनसेवा हायस्कूल थेरगांव, सैदापूर, जि. कोल्हापूर” या मराठी माध्यमाच्या इयत्ता ८ ते १० वी च्या माध्यमिक शाळेस एकूण मुल्यांकनात ६६.५ गुण मिळाल्याने अनुदानासाठी अपात्र करण्यात आले आहे. सदर आदेशाच्या विरोधात सदर संस्थेने मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे रिट याचिका क्र. ११५८७/२०१९ दाखल केली होती. सदर याचिकेवर मा. उच्च न्यायालयाने दि. ०७ जुलै, २०२२ रोजी खालील प्रमाणे अंतिम निर्णय दिलेला आहे.

- It appears that inadvertently the name of the Petitioner was included in the list of ineligible school. This Court has also passed an order directing not to withhold the grant of the Petitioners’ school only on the ground that the backlog exists.
- It also appears that the Commissioner of Education has sent proposal to Respondent No.1 that the Petitioner school is entitled for the salary grant. In fact, it for more than one year, the proposal is still pending with the State Government.
- In light of that, the State Government shall approve the proposal sent by the Commissioner as the Petitioner already obtained more than 65 marks.
- The Respondent shall as such release the salary grants to the Petitioner as applicable and as per the order dated 16 July 2014 and 6 August 2014 passed in Writ Petition No. 10440 of 2013. The same shall be released expeditiously.
- Writ Petition is accordingly disposed of with the aforesaid observations. No costs.”

७. मा. उच्च न्यायालयाचे उक्त आदेश विचारात घेता, जनसेवा शिक्षण प्रसारक थेरगांव सैदापूर संचालित जनसेवा हायस्कूल थेरगांव, सैदापूर, जि. कोल्हापूर या मराठी माध्यमाच्या इयत्ता ८ ते १० वी या माध्यमिक शाळेस अनुदानास पात्र करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णयः-**

उपरोक्त प्रस्तावनेत नमूद केलेले विवेचन विचारात घेता, संदर्भ क्र. (९) येथील शासन निर्णय, दि. ०४ ऑगस्ट, २०१५ सोबतच्या "प्रपत्र-क" मधील अ.क्र.(६) येथील "जनसेवा शिक्षण प्रसारक थेरगांव सैदापूर संचालित जनसेवा हायस्कूल थेरगांव, सैदापूर, जि. कोल्हापूर" या शाळेबाबतची नोंद वगळण्यात येत आहे.

२. संदर्भ क्र. (१०) येथे नमूद मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे रिट याचिका क्र. ११५८७/२०१९ मध्ये मा. न्यायालयाने दि. ०७ जुलै, २०२२ रोजी दिलेल्या निर्णयानुसार जनसेवा शिक्षण प्रसारक थेरगांव सैदापूर संचालित जनसेवा हायस्कूल थेरगांव, सैदापूर, जि. कोल्हापूर या मराठी माध्यमाच्या शाळेस खालील अटी व शर्तीच्या अधीनतेने शासन निर्णय, दि.१९ सप्टेंबर, २०१६ नुसार सरसकट २० टक्के अनुदानास पात्र करण्यात येत आहे.

(१) संदर्भ क्र. (११) येथील शासन निर्णय, दि.०६फेब्रुवारी, २०२३ मधील अटी व शर्तीच्या अधीन राहून उक्त माध्यमिक शाळेच्या इयत्ता ८ ते १० वी करीता ४ पदवीधर शिक्षक, १ लिपिक व १ शिपाई पदांना या शासन निर्णयाच्या दिनांकापासून सरसकट २० टक्के अनुदानासाठी पात्र करण्यात येत आहे.

(२) सदर संस्थेच्या उक्त शाळेस अनुदानासाठी पात्र केल्याने यावर होणारा खर्च विधानमंडळाच्या निदर्शनास आणण्यासाठी पुरवणी मागणीचा प्रस्ताव शासनास सादर करण्यात यावा.

(३) सदरहू शाळेच्या वैयक्तिक मान्यता दिलेल्या शिक्षक व शिक्षकेतर पदांनाच वेतन अनुदान अनुज्ञेय राहील, याची संबंधित शिक्षणाधिकारी (माध्यमिक) यांनी खातरजमा करावी.

(४) तसेच, संस्थेच्या शाळेस अनुदान वितरीत करताना संस्था शासनाने वेळोवेळी दिलेल्या अटी व शर्ती पूर्ण करीत असल्याची खात्री संबंधित शिक्षणाधिकारी (माध्यमिक) यांनी करावी.

३. यावर होणारा खर्च मागणी क्र. ई-२, २२०२ , सर्वसाधारण शिक्षण, (००)(११) नवीन अशासकीय माध्यमिक शाळा उघडणे ( अनिवार्य ) ३६, सहायक अनुदाने (वेतन) (२२०२ ३३६१) या लेखाशिर्षाखाली खर्ची घालण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.५०३/व्यय-५, दि.२७ मे, २०२४ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०६२०१७३५५०४४२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

PRAMOD VITHOBA KADAM

Digitally signed by PRAMOD VITHOBA KADAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=f82b9e0b005ed06987e1ae26683203c8f241022e0aad6b1c827af561b72f83bb, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AF4901BED6A4BEE0ED963C63F1B0172A4718894A400C0988FBB3381DB913696F, cn=PRAMOD VITHOBA KADAM
Date: 2024.06.20 17:52:09 +05'30'

**( प्रमोद कदम )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय , मुंबई

२) मा. उपमुख्यमंत्री ( गृह ) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. उपमुख्यमंत्री ( वित्त व नियोजन ) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा. मंत्री (शालेय शिक्षण ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) अपर मुख्य सचिव (वित्त) वित्त विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
६) प्रधान सचिव (व्यय) वित्त विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई,
७) प्रधान सचिव ( शालेय शिक्षण ) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
८) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे,
९) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) म.रा. पुणे,
१०) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र , १/२ मुंबई / नागपुर,
११) महालेखापाल (लेखापरीक्षा ) महाराष्ट्र , १/२ मुंबई/नागपुर,
१२) महालेखापाल (स्थायिक निकाल लेखा परीक्षा व लेखा) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर,
१३) स्थानिक निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१४) विभागीय शिक्षण उपसंचालक, कोल्हापूर विभाग.
१५) शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जिल्हा परिषद, कोल्हापूर.
१६) अधिक्षक, वेतन पथक (माध्यमिक) जिल्हा परिषद, संबंधित
१७) निवड नस्ती, एसएम-४.